बुलढाणा जिल्ह्यातील वडगांव माळी - सावंगीर - मोहोदरी - कोयाळी - बाभुळखेडते - रा.मा.-२१४ - सारंगपूर (मेहकर वळण मार्ग) ते गणपूर बोराखेडी रस्ता या रस्त्याची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१९/प्र.क्र.०२/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०६ फेब्रुवारी, २०१९

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र क्र.का२(२)/दर्जोन्नती/२०१८/४३९२ दि. ०१/११/२०१८.

**प्रस्तावना** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांनी संदर्भाधिन पत्रान्वये बुलडाणा जिल्ह्यातील वडगांव माळी - सावंगीर - मोहोदरी - कोयाळी - बाभुळखेडते - राज्यमार्ग-२१४ - सारंगपूर (मेहकर वळण मार्ग) ते गणपूर - बोराखेडी रस्ता या रस्त्याची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, बुलडाणा यांनी सदर रस्ता दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यावरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या तसेच रस्त्याचा एकुण होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, बुलडाणा यांची मागणी विचारात घेता सदर रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, बुलडाणा यांचा ठराव विचारात घेऊन बुलडाणा जिल्ह्यातील खालील रस्ता दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | समाविष्ठ रस्त्यांचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रमुख जिल्हा मार्ग-३४ - वडगांव माळी - सावंगीर - मोहोदरी - कोयाळी - बाभुळखेडते - राज्यमार्ग-२१४ - सारंगपूर (मेहकर वळण मार्ग) ते गणपूर बोराखेडी रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १४१ | (०/०० ते १२/४००) १२.४०० कि.मी. | १९.९०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१०० |
| | | इतर जिल्हा मार्ग १४३ | ( ०/०० ते ७/५००) ७.५०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **१९.९०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील बुलडाणा जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या लांबीत **१९.९०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२२५४.०४० + १९.९००) म्हणजेच **२२७३.९४० कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** लांबीत **१९.९०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१५१३.७४० - १९.९००) म्हणजेच **१४९३.८४० कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०६१७४४१६९७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2019.02.06 17:45:42 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी,बुलडाणा.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, अकोला (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बुलडाणा.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) निवडनस्ती.